कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता / सहायक अभियंता श्रेणी-२ संवर्गातील अभियंत्यांना जलसंपदा विभागामध्ये पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शासन आदेश क्र :- बदली- २०२३/प्र.क्र.७१/आ.(शा.अ.)**

**जलसंपदा विभाग, मंत्रालय,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :-१८.०८.२०२३

संदर्भ :- १. मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०२३/प्र.क्र.१४७/जल-२, दि.२६.०५.२०२३

२. मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०२३/प्र.क्र.१८३/जल-२, दि.२१.०६.२०२३.

३. मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०२३/प्र.क्र.५/जल-२, दि.२७.०६.२०२३

**शासन आदेश :-**

मृद व जलसंधारण विभागाच्या संदर्भांकीत आदेशान्वये श्री.रत्नदीप रामहरी वासनिक व श्री.प्रशांत गजानन वारे, दोन्ही सहायक अभियंता श्रेणी-२ आणि श्रीमती शुभांगी भास्कर पाटील, कनिष्ठ अभियंता यांच्या सेवा जलसंपदा विभागामध्ये प्रत्यार्पित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदींनुसार खालील विवरणपत्रातील (स्तंभ-२ मध्ये) नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता/ सहायक अभियंता, श्रेणी-२ संवर्गातील अभियंत्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी (स्तंभ-५ नुसार) विनंतीनुसार बदली करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अभियंत्याचे नाव | कार्यरत असलेले ठिकाण | जलसंपदा विभागामध्ये हजर झालेला दिनांक | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.रत्नदिप रामहरी वासनिक, सहायक अभियंता श्रेणी-२ | मृद व जलसंधारण विभाग, अंतर्गत लघु सिंचन जलसंधारण विभाग, कळवा-ठाणे अंतर्गत उपविभाग सुर्यानगर, जि.पालघर | दिनांक २९.०५.२०२३ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई अंतर्गत ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गत रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड अंतर्गत पाटबंधारे उपविभाग, कोलाड (आंबा खोरे) **(विनंतीनुसार/रिक्त पदी)** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २. | श्री.प्रशांत गजानन वारे, जलसंधारण अधिकारी सहायक अभियंता श्रेणी-२ | मृद व जलसंधारण विभाग अंतर्गत मृद व जलसंधारण उपविभाग सुर्यानगर | दिनांक २२.०६.२०२३ | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई अंतर्गत ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गत ठाणे लघु पाटबंधारे विभाग, कळवा, ठाणे अंतर्गत पाटबंधारे उपविभाग क्र.२, कळवा ठाणे अंतर्गत शाखा जव्हार **(विनंतीनुसार/ रिक्त पदी)** |
| ३. | श्रीमती शुभांगी भास्कर पाटील, जलसंधारण अधिकारी (क.अ.) | अप्पर आयुक्त, जलसंधारण मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे अंतर्गत मृद व जलसंधारण विभाग, पुणे अंतर्गत मृद व जलसंधारण विभाग, सातारा मुख्यालयी | दिनांक २८.०६.२०२३ | मुख्य अभियंता(जसं), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत टेंभु उपसा सिंचन प्रकल्प विभाग क्र.१, सांगली (मुख्यालयी) **(विनंतीनुसार/रिक्त पदी)** |

२. श्री.वासनिक,श्री.वारे दोन्ही सहायक अभियंता श्रेणी-२ व श्रीमती पाटील, कनिष्ठ अभियंता यांनी संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडे तात्काळ रुजू व्हावे.

**३.** श्री.वासनिक, श्री.वारे दोन्ही सहायक अभियंता श्रेणी-२ व श्रीमती पाटील, कनिष्ठ अभियंता यांची पदस्थापना ज्या कार्यालयात करण्यात आली आहे, त्या कार्यालयाच्या संबंधित मुख्य अभियंता यांनी उपरोक्त आदेशातील स्तंभ-५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित अभियंत्यांचे सविस्तर पदस्थापनेचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

**४.** संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता यांना कळविण्यात येते की, त्यांनी संबंधित अभियंत्यांना सविस्तर पदस्थापना देताना सदर ठिकाणी कोणत्याही परिस्थितीत मंजूर पदांपेक्षा जास्त कनिष्ठ अभियंता /शाखा अभियंता/सहायक अभियंता श्रेणी-२ संवर्गातील अभियंता कार्यरत राहणार नाहीत, याची सर्वार्थाने दक्षता घ्यावी.

**५.** आदेशात नमूद अभियंता ज्या कार्यालयात कार्यरत आहेत, त्या कार्यालयाच्या संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना कळविण्यात येते की, वरीलप्रमाणे सेवा प्रत्यार्पित करण्यात आलेल्या अभियंत्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र पदस्थापना देण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

**६.** श्री.वासनिक, श्री.वारे दोन्ही सहायक अभियंता श्रेणी-२ व श्रीमती पाटील, कनिष्ठ अभियंता यांना बदली विषयक प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

**७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०८१८१६३१३१८७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=0243d4781b79f364761efde22e15161622e87986fb431d9cbc0ecc6469d5e203, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A8B949B82C94F286DC79EF74BFCAE2A4E204E31853685E98B0B86C438C888E9, cn=ANIL VITTHAL DEOKATE
Date: 2023.08.18 16:34:23 +05'30'

**(अनिल देवकाते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. अपर मुख्य सचिव (जसं.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा), यांचे कार्यालय मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
६. महालेखापाल-१/२(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ठाणे/सांगली
८. मुख्य अभियंता(जसं), जलसंपदा विभाग, पुणे
९. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१०.आयुक्त, मृद व जलसंधारण, वाल्मी, औरंगाबाद
११.अपर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे
१२.प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे
१३.प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे
१४.श्री.रत्नदीप रामहरी वासनिक,(मार्फत:- प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे)
१५.श्री.प्रशांत गजानन वारे,( मार्फत:- प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे)
१६.श्रीमती शुभांगी भास्कर पाटील, कनिष्ठ अभियंता(मार्फत:- प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे)
१७.कार्यासन(जल-२), मृद व जलसंधारण विभाग, मुंबई
१८.आ (शा.अ.) कार्यासन संग्रहार्थ.